नगर रचना योजना क्र.३(अंतिम) सोलापूर
महाराष्ट्र प्रादेशिक व नगर रचना
अधिनियम, १९६६ चे कलम-११(२)
अन्वये कार्यवाही करणेस प्राधिकृत करणेबाबत.

# महाराष्ट्र शासन

नगर विकास विभाग
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
शासन निर्णय क्रमांक-टिपीएस-१७०८/१७८१/प्र.क्र.१६३५/०९/नवि-१३
दिनांक :- १८.०१.२०१०

<u>शासन निर्णय</u> :- सोबतची शासकिय अधिसूचना महाराष्ट्र शासनाच्या राजपत्रा मध्ये प्रसिद्ध करावी.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

(वि. म. रानडे)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रति,
विभागीय आयुक्त, पुणे विभाग, पुणे.
संचालक, नगर रचना, महाराष्ट्र राज्य, पुणे.
जिल्हाधिकारी सोलापूर,
आयुक्त, सोलापूर महानगरपालिका, सोलापूर.
उपसंचालक नगर रचना, पुणे विभाग, पुणे
सहाय्यक संचालक नगर रचना, , सोलापूर शाखा, सोलापूर.
व्यवस्थापक, येरवडा कारागृह मुद्रणालय, पुणे.

(त्यांना विनंती करण्यात येते की, सोबतची शासकीय अधिसूचना महाराष्ट्र शासनाच्या राजपत्राच्या भाग-१, पुणे विभाग, पुणे पुरवणी भाग-१ मध्ये प्रसिद्ध करून त्याच्या प्रत्येकी १० प्रती या विभागास, संचालक नगर रचना, महाराष्ट्र राज्य, पुणे, आयुक्त सोलापूर महानगरपालिका, सोलापूर जिल्हाधिकारी, सोलापूर, उपसंचालक नगर रचना, पुणे विभाग, पुणे, सहाय्यक संचालक नगर रचना, पुणे शाखा, पुणे, यांना पाठवाव्यात)

कक्ष अधिकारी (नवि-२१), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.

त्यांना विनंती करण्यात येते की, सदर अधिसूचना शासनाच्या वेबसाईटवर प्रसिद्ध करावी.

निवडनस्ती (नवि-१३)

Repeat Notification Dt.23.11.09

# अधिसूचना

**महाराष्ट्र शासन**

नगर विकास विभाग,

मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२

दिनांक :- १८.०१.२०१०

क्रमांक-टिपीएस-१७०८/१७८१/प्र.क्र.१६२५/२००९/नवि-१२

महाराष्ट्र प्रादेशिक व नगररचना अधिनियम १९६६

ज्याअर्थी, नगर रचना योजना क्र.३, सोलापूर (अंतिम)(यापुढे "उक्त नगर रचना योजना" असे उल्लेखित) महाराष्ट्र प्रादेशिक नियोजन व नगर रचना अधिनियम, १९६६ (१९६६ चा महा.अधि.३७)(यापुढे "उक्त अधिनियम" असे उल्लेखिलेला) च्या कलम ८६ मधील तरतूदीनुसार शासनाच्या नगर विकास विभागाकडील अधिसूचना क्र.टिपीएस-१७७९/१६०३/नवि-७, दि.४.०७.१९७९ अन्वये मंजूर झाली असून, ती दि.१०.१०.१९७९ पासून अंमलात आली आहे.

आणि ज्याअर्थी, सोलापूर महानगरपालिकेने उक्त नगर रचना योजनेमधील अंतिम भूखंड क्रमांक २२ ही दफनभूमी व दहनभूमी साठी आरक्षीत असलेली जागा रहिवास विभागात समाविष्ट करणे बाबतचा फेरबदलाचा प्रस्ताव (यापुढे उक्त फेरबदल असे उल्लेखिलेला) उक्त अधिनियमाचे कलम ९१ मधील तरतूदीनुसार सर्व वैधानिक कार्यवाही पूर्ण करुन अहवाल दि.८.७.२००८ चे पत्राने सादर केला आहे;

आणि ज्याअर्थी शासनाने उक्त अधिनियमाचे कलम ९१ चे तरतुदीनुसार सोलापूर महानगपालिकेस प्राधिकृत केल्यानंतरची कार्यवाही अधिसूचनेद्वारे प्राधिकृत करण्यापूर्वीच सोलापूर महानगरपालिकेने पूर्ण केलेली आहे;

आणि ज्याअर्थी, उक्त अधिनियमाच्या कलम ९१ च्या तरतुदीनुसार सोलापूर महानगरपालिकेस फेरबदल करण्यासाठी राजपत्रातील अधिसूचनेद्वारे प्राधिकृत करण्याची कायदेशीर तरतूदीची उणीव रहात होती.

त्याअर्थी, आता उक्त अधिनियमाच्या कलम-९१ चे उपकलम (२) अन्वये प्रदत्त असलेल्या आणि या संबंधातील इतर सर्व अधिकारांचा वापर करुन उक्त नगर रचना योजनेत सोलापूर महानगरपालिकेने केलेल्या उक्त फेरबदलासाठी उक्त अधिनियमाच्या कलम ९१(२) अन्वये सोलापूर महानगरपालिकेस प्राधिकृत करण्यास कार्योत्तर मंजूरी देत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

(वि.म.रानडे)

शासनाचे अवर सचिव, महाराष्ट्र राज्य

Repor Notification Dt.23.11.09

## NOTIFICATION

**Government of Maharashtra**
**Urban Development Department,**
**Mantralaya, Mumbai 400 032.**
**Date- 18.01.2010**

No.TPS-1708/1781/CR-1635/2009/UD-13

Maharashtra Regional & Town Planning Act 1966.

Whereas, the Town Planning Scheme No.3, Solapur (Final) (hereinafter referred to as 'the said scheme') has been sanctioned by the Government in Urban Development Department under the provisions of section 86 of the Maharashtra Regional and Town Planning Act, 1966 (Mah.Act No.XXXVII of 1966) (hereinafter referred to as the 'said Act') vide notification no.TPS-1779/1601/UD-7, dated 04.07.1979 and has come into force with effect from 10.10.1979;

And whereas, the Solapur Municipal Corporation vide its letter dt. 8.7.2008 has submitted the proposal of deletion of the reservation of Cremation & Burial Ground on land bearing F.P.No.22 of said scheme and to include the land thereunder in Residential Zone (hereinafter referred to as the said variation) to Govt. after following procedure as laid down under Sec.91 of the said Act;

And whereas Solapur Municipal Corporation has carried out all the procedure of the said variation under section 91 of the said Act before notifying authorisation;

And whereas there was a legal lacuna of not authorising Solap Municipal Corporation by Notification to carryout the said variation under section 91 of the said Act.

Now, therefore, in exercise of the powers conferred by sub section (2) of section 91 of the said Act and all other powers enabling in this behalf, the Government in Urban Development Department hereby accords post facto sanction to authorise the Solapur Municipal Corporation for the said variation undertaken to the said scheme as per the provisions laid down under section 91(2) of the said Act;

By order and in the name of the Governor of Maharashtra,

(V.M. Ranade)
Under Secretary to Government

Repet Notification Dt. 13.11.09